# बीट्रीसची बकरी

पेज मैकबियर

चित्र: लोरी



हेइफ़र इंटरनेशनल एक नफा न मिळवणारी संघटना आहे. जी भूक आणि गरिबी संपवण्यासाठी आणि शेती उपयुक्त जनावरे भेट देण्यासाठी आणि प्रशिक्षणद्वारे पृथ्वीला वाचवण्यासाठी काम करते. साठ वर्षात हेइफ़रने अमेरिकेसहित १२८ देशांमध्ये ४५ लाख लोकांना आत्मनिर्भर होण्यासाठी मदत केली आहे.

हेइफ़रचा विचार सरळ आहे, आणि तो चांगल्याप्रकारे कामही करतो. भुकेल्या कुटुंबांना जेवण देण्याऐवजी हेइफ़र इंटरनेशनल त्यांनी एखादे जनावर "जीवित ऋण" म्हणून देते. ज्यामुळे त्या कुटुंबाचे स्वास्थ्य आणि जीवनाच्या स्तरात खूप सुधारणा होत आहे. ते जनावर गाय किंवा दूध देणारी बकरी, अंडे देणारी कोंबडी, शेताच्या नांगरणीसाठी बैल किंवा लोकर देणारी मेंढी  असू शकते.

हेइफ़र जनावरांची काळजी आणि पर्यावरण पूरक शेती कशी करायची याचेही प्रशिक्षण देते. प्रत्येक कुटुंब याबदल्यात आपल्याला मिळालेली माहीती इतर कुटुंबाला सांगतो. त्यामुळे आशेची आणि उमेदीची एक साखळी तयार होईल आणि ती सर्व समाजाला उभं करेन. अधिक माहीती जाणून घेण्यासाठी  कृपया www.heifer.org  वर जा.

# बीट्रीसची बकरी

पेज मैकबियर
मराठी: अश्विनी बर्वे



जर तुम्ही पश्चिमी युगांडाच्या पहाडामधून छोट्या किसिंगा या आफ्रिकी गावाचा प्रवास करत असाल, आणि जर तुम्ही चौकातून डाव्याबाजूला गेले आणि केळ्यांच्या दोन उंच झाडामधून जाणाऱ्या छोट्या कच्च्या रस्त्याने जातात, तेव्हा तुम्हाला तिथे बीट्रीस नावाच्या मुलीच्या घरी पोहचाल.

बीट्रीस इथे आपली आई आणि पाच छोटे भाऊ आणि बहिणी बरोबर एका मजबूत मातीच्या घरात राहत आहे. घर नवीन आहे आणि त्यावर मजबूत पत्र्यांचे छत आहे. घरामध्ये चमकदार लाकडी फर्निचर आहे. वास्तवात, बीट्रीस आणि तिच्या कुटुंबाने आत्ताच यातील काही वस्तू खरेदी केल्या आहेत.



आणि हे सगळे मुगीसा नावाच्या बकरीमुळे शक्य झाले आहे. बीट्रीसाला मुगीसाच्या सर्व गोष्टी आवडतात. ती तिची जाड, भुऱ्या आणि पांढऱ्या रंगाची त्वचा आणि तिची हनुवटीवरील केस खाजवते. मुगीसापण बीट्रीसवर प्रेम करते आणि ती आपली शिंगे हळूहळू बीट्रीसच्या हातांना रगडते.

पण एक महत्वाचे कारण आहे ज्यामुळे बीट्रीस, मुगीसावर सगळ्यात जास्त प्रेम करते.

मुगीसा येण्याआधी बीट्रीस शेतात रोपे लावण्यासाठी, कोंबड्यांची काळजी घेण्यासाठी, लहान मुलांची काळजी घेण्यात आणि दळण दळण्यासाठी आईला मदत करत असे. पीठ विकण्यासाठी ती बाजारात घेऊन जात असे.

कधी–कधी, जेव्हा ती छोट्या बाळाची पास्कावियाची देखभाल करत असे, तेव्हा बीट्रीस शाळेच्या दरवाज्याजवळ उभी राहत असे. विद्यार्थी जेव्हा फणसाच्या झाडाच्या सावलीत काम करण्यासाठी आपले लाकडी बेंच बाहेर घेऊन येत, तेव्हा बीट्रीस चुपचाप एका बाजूला उभी राहत असे आणि नाटक करे की ती त्या शाळेची विद्यार्थिनी आहे.

शाळेची विद्यार्थिनी होण्याची तिची खूप इच्छा होती. ती शाळेच्या बेंचवर बसण्यासाठी तडफडत होती आणि तिला छोट्या पाटीवर प्रश्न लिहून ते सोडवण्याची इच्छा होती. तिला वापरून जुन्या झालेल्या पुस्तकाची पाने उलटावे वाटत होते. जोपर्यंत तो शब्द तिच्या पक्का लक्षात राहत नाही तोपर्यंत प्रत्येक शब्द परत परत वाचवा असे तिला वाटत होते.

“मी कधी शाळेत जाऊ शकणार नाही,” ती दुःख करत म्हणाली. “मी पुस्तकांसाठी आणि शाळेच्या यूनिफार्मसाठी कधीच पुरेसे पैसे जमा करू शकणार नाही?”



एक दिवस जेव्हा बीट्रीस खुरपण्यात व्यग्र होती, तेव्हा आई डोळे नाचवत तिच्याकडे आली. "बीट्रीस, दूर देशातील काही दयाळू लोकांनी आपल्याला एक भाग्यशाली भेट दिली आहे. गावातील बारा कुटुंबांपैकी आपल्या कुटुंबाला एक बकरी देण्यासाठी निवडले गेले आहे."

बीट्रीस हैरान झाली. एक बकरी? बकरी ही कशी भेट होऊ शकते? ती रोज सकाळी उठून कोळश्याची शेगडी पेटवू शकत नाही. ती दर आठवड्याला नदीवर जाऊन पूर्ण कुटुंबाचे मळलेले कपडे धुवू शकत नाही. ती ग्रेस, मूसा, हैरियट, योआश आणि पास्काविवियावर नजर ठेवू शकत नाही.

बीट्रीसची लांब बोटे काळजीपूर्वक खुरपण्याचे काम करत होती.

"हे खूप चांगले आहे, आई," बीट्रीसने मोठ्या नम्रतेने म्हटले.

मग आई म्हणाली, "जेव्हा आपली बकरी येईल तेव्हा तिची काळजी घेण्याचे काम तुझे असेल. जर तू हे काम करशील तर आपल्या कुटुंबाला खूप फायदा होईल."



बीट्रीसने आपल्या आईकडे बघितले. "ती बकरी लवकर येईल का?" तिने विचारले. "कारण त्या बकरीला मला नक्की भेटायची इच्छा आहे."

आई हसली. "हे बघ, चांगल्या गोष्टींना नेहमी वेळ लागतो. त्याआधी मला बकरीसाठी घास उगवावा लागेल आणि तिला राहण्यासाठी शेड तयार करावी लागेल."

बीट्रीसने सावकाश आपली मान हलवली.आईल ती काय करत होती त्याची नक्कीच माहीती होती. "मी तुला मदत करू का?" तिने आईला विचारले.





पुढचे काही महिने बीट्रीसने आधीपेक्षा खूप कष्ट केले. तिने शेडच्या भिंती बांधण्यासाठी लागणारे खांब गोळा करण्यास आईला मदत केली, मग केळीच्या झाडाच्या दोरीने ते खांब एकमेकांना बांधले. तिने कसावाच्या शेताच्या किनाऱ्यावर उगवलेले उंच हत्ती गवताच्या पट्ट्या पण लावल्या. तिने केळ्यांच्या छोट्या झाडांमध्ये वालाच्या वेली लावल्या.

शेवटी एक दिवस बीट्रीसची बकरी आली. ती एका पिकलेल्या आंब्यासारखी मोठी आणि मऊ होती. बीट्रीस आपल्या भावाबहिणीबरोबर बकरीजवळ उभी राहिली. मग ती पुढे झाली आणि तिने बकरी भोवती एक परिक्रमा केली. तिने आपले गुडघे टेकवून बकरीच्या पोटाचे निरीक्षण केले.आणि आपला हात तिच्या मऊ पाठीवरून फिरवला. “आई म्हणते की तू आमच्यासाठी भाग्यशाली भेट आहे,” ती कुजबुजली. “म्हणून तुझे नाव मुगीसा ... म्हणजे "भाग्यशाली" ठेवेन."

दोन आठवड्यानंतर, मुगीसाने पिल्लांना जन्म दिला, बीट्रीसने आधी एका बाळाचा शोध घेतला आणि मग तिला आश्चर्य वाटले जेव्हा तिने दुसरे पिल्लू बघितले. “जुळी पिल्ले!” ती ओरडली,आणि परत बघण्यासाठी खाली वाकली . “बघ मुगीसा! तू आम्हांला आत्ता आत्ता दोन अद्भुत भेटी दिल्या.” बीट्रीसने आधीच्या पिल्लाचे नाव मुलिंडवा ठेवले ज्याचा अर्थ होता "अपेक्षित“ (एक्सपेक्टेड), आणि दुसऱ्याचे नाव किहेम्बो, म्हणजे "आश्चर्य“ (सप्राइज़) ठेवले.



प्रत्येक दिवशी बीट्रीसने याकडे लक्ष ठेवले की मुगीसाला अतिरिक्त घास आणि पाणी मिळेल. ज्यामुळे ती जास्त दूध देऊ शकेल. पाणी आणण्यासाठी बीट्रीसला नदीपर्यंत एका वेळी खूप लांब जावे लागत असे.

जेव्हा बकरीच्या पिल्लांना आईच्या दुधाची गरज राहिली नाही तेव्हा बीट्रीसने मुगीसाच्या दुधाची पहिली चव घेतली. “एकदम गोड,” ती म्हणाली आणि मग तिने नाष्ट्याच्या दलियामध्ये दूध घातले. बीट्रीसला माहीत होते की मुगीसाचे दूध घरातील सर्वजणांना अधिक स्वस्थ ठेवेल.

आता रोज सकाळी नाश्ता झाल्यावर, बीट्रीस बकरीच्या शेडमध्ये जाई आणि जे दूध उरले असेल ते विकत असे. “माझे दुकान व्यवसायासाठी उघडे आहे,” ती म्हणे, जसे कोणी तिचे बोलणे ऐकते आहे?

नेहमी, ती केळीच्या झाडांमधून येणाऱ्या तिच्या मित्र-मैत्रिणीकडे बघत असे.

"गुड-मॉर्निंग, बीट्रीस, मुगीसा आणि तिच्या पिल्लानो,”बुनाने नेहमी म्हणत असे. मग तो बीट्रीसला एक बादली देत असे जी दुधाने भरून ती देत असे.

जेव्हा बीट्रीस त्याला दूधाची बदली सोपवत असे, तेव्हा बुनाने तिला एक चमकदार नाणे देत असे. बीट्रीस लक्षपूर्वक ते पैसे पर्समध्ये ठेवत असे.

दिवसेंदिवस-आठवडे न आठवडे, बीट्रीसची पर्स पैशांनी भरू लागली. ल्च्क्रच तिच्याजवळ मोसेजसाठी एक नवीन शर्ट आणि ग्रेससाठी एक गरम कांबळ्यासाठी पुरेसे पैसे जमा झाले.



एक दिवस, जेव्हा बीट्रीस पाणी घेऊन परत आली तेव्हा तिने बघितले की आई बटव्यातील पैसे मोजत होती. बीट्रीसने पाण्याची भांडी खाली ठेवली आणि ती पळत आपल्या आईजवळ पोहचली. “आई! हे काय आहे?” तिने विचारले.

“काही गडबड झाली का?”





जेव्हा बीट्रीसने वर बघितले तेव्हा आईचा राग एका छोट्या हास्यात बदलले. “मला वाटते की,” आई म्हणाली, “तुझ्या शाळेची फी भरण्याइतके पैसे आपण जमा केले आहे.”

“शाळा?" बीट्रीसने अविश्वासाने विचारले, “पण बाकी त्या गोष्टींचे काय होईल ज्या आपल्याला पाहिजे आहेत?”

“बाळा, तुझे शिक्षण सगळ्यात आधी येते,” आई म्हणाली.

बीट्रीसने आपल्या आईला मिठी मारली, “आई तुझे आभार.” मग ती पळाली जिथे तिची बकरी उभी होती आणि घास खात होती आणि तिने आपल्या बकरीला घट्ट मिठी मारली. "ओह, मुगीसा!" ती कुजबुजली. “आज मी किती भाग्यवान आहे, तू मला जी भेट दिली जी मला अनेक दिवसांपासून मला हवी होती.”

पुढच्या आठवड्यापासून बीट्रीस शाळेत जाऊ लागली. पहिल्या सकाळी जेव्हा तिला शाळेत जायचे होते, तेव्हा तिने आपले नवीन पिवळे ब्लाउज आणि निळा पेटीकोट घालून ती मुगीसाचे दूध विकण्यासाठी ग्राहकांची वाट बघत ती गर्वाने बसली.

बीट्रीस थोडीशी उदास होती आणि त्याचबरोबर ती उत्साहितपण होती. मुगीसाने आपले मोठे शरीर बीट्रीसच्या गालावर घासले." ओह, मुगीसा," बीट्रीस रडू लागली. "मला आज तुझी खूप आठवण येईल.".

मग बीट्रीसने परत त्या गोष्टींचा विचार केला ज्या मुगीसामुळे झाल्या. आई म्हणाली की लवकरच मुगीसाचे पिल्लू "सरप्राइज" खूप पैशांना विकले जाईल. "मग आपण आपले हे जुने घर मोडून नवीन घर बांधू." आईने समजावले. "मग आपण स्टीलचे नवीन छत लावू शकू जे पावसाळ्यात गळणार नाही."



तेव्हा बीट्रीसने एक आवाज ऐकला आणि बघितले तर बुनाने आपली रिकामी बादली घेऊन तिच्याकडे येत आहे. बुनानेने बीट्रीसला शाळेच्या नवीन कपड्यात बघितले आणि श्वास सोडला. “तू खूप भाग्यशाली आहे. जर मी पण शाळेत जाऊ शकलो तर.”

बीट्रीस बाहेर आली आणि तिने बुनानेच्या खांद्याला हात लावत म्हटले: “मी ऐकले की तुमचे कुटुंब सुद्धा बकरी मिळवण्याच्या रांगेत आहे.”

बुनानेच्या चेहऱ्यावर एक स्मित आले. “हो, ते खरे आहे.”

“खरंच?."

मग बीट्रीसने मुगीसाच्या नाकाचा पापा घेतला आणि शाळेसाठी निघाली.





## हिलेरी रोडम क्लिंटन यांचे अंतिम शब्द

अनेक वर्षांपासून हेइफ़र इंटरनेशनल संस्थेबद्दल मला माहीती आहे. आणि त्यांच्या कामाची प्रशंसक आहे. या संस्थेने पेज मैकबियर आणि लोरी लोहस्टोएटर यांना मुलांच्या चित्र पुस्तकावर काम करण्यासाठी पूर्व आफ्रिकेत आमंत्रित केले. बीट्रीस, एक नऊ वर्षाची युगांडाच्या मुलीबाबत एक खरी गोष्ट, या प्रवासाचे फलित आहे. ही मनाला स्पर्शून जाणारी गोष्ट आहे आणि ती आम्हांला सांगते की लोक, मग ते कुठेही राहत असू दे, ते आपल्या चांगल्यासाठी आपले जीवन जरूर बदलू शकतात. असे करण्यासाठी, त्यांना तीन गोष्टींची गरज आहे : संसाधन, प्रशिक्षण आणि आपल्या समुहाचे समर्थन.

हेइफ़रच्या माध्यमातून, बीट्रीसच्या परिवाराला त्या तीन गोष्टी मिळाल्या. त्यांना एक बकरी मिळाली जी त्यांना पोषण आणि उत्पन्न देत असे. पर्यावरणाचे नुकसान न करता या अनमोल भेटीची देखभाल करण्याचे ज्ञान, आणि एक सहायक समुहपण जो मुगीसाच्या पिल्लांमुळे होणारा फायदा वाटून घेण्यास तत्पर आहे. आता बीट्रीस आणि तिच्या भावाबहिणींकडे पिण्यासाठी दूध आहे, ते आता कुपोषित नाहीत. वाढीव दुधाची ते विक्री करत असल्यामुळे त्यांच्या उत्पन्नात वाढ झाल्याने बीट्रीसला प्रथमच शाळेत जाण्याची संधी मिळाली आहे, त्याचबरोबर तिचे कुटुंब आता स्थिरस्थावर झाले आहे,त्यांना खात्री आहे की गरज पडली तर आवश्यक औषधे, कपडे आणि इतर वस्तू खरेदी करण्यासाठी त्यांच्याकडे नेहमी पैसे असतील, लवकरच अजून एक परिवार,मग दुसरा आणि मग तिसरा परिवार या लाभाचा आनंद घेईल.

**या देशात आणि जगात प्रवास करतांना मी बघितले की अजूनही खूप मुलांना चांगले आरोग्य, गुणवत्तापूर्ण शिक्षण आणि मोठं होतांना एका आशावादी भविष्याची संधी त्यांच्याकडे उपलब्ध नाही. बीट्रीसची कहाणी आपल्या सर्वांना त्यासाठी प्रयत्न करण्यासाठी एक मार्गदर्शन आहे, ज्यात ते संसाधने देतात, परिवाराला शिक्षित करतात आणि पूर्ण समूहाचे जीवन सुधारण्याचा प्रयत्न करतात.**

